राजर्षी छत्रपती शाहू महाराज शासकीय वैद्यकीय महाविद्यालय शेंडापार्क, कोल्हापूर येथे ६०० खाटांचे सामान्य रुग्णालय, २५० खाटांचे अतिविशेषोपचार रुग्णालय तसेच २५० खाटांच्या कर्करोग रुग्णालय इमारतींकरीता कॉंक्रीट रस्ता (टप्पा-२), विद्युतीकरण व इतर अनुषंगिक कामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,
शासन निर्णय, क्रमांक : जीसीके-२०२५/प्र.क्र.२६८/प्रशा-१,
गोकुलदास तेजपाल रुग्णालय आवार, नवीन गो.ते.संकुल,
९ वा मजला, मंत्रालय, मुंबई -४०० ००१.
दिनांक : २२ मे, २०२५

वाचा : आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व आयुष,महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्रमांक : संवैशिवसं/शावैमरुकोल्हापूर/कॉंक्रीट रस्ता टप्पा-२/३४४८/आय-प/२४,दिनांक १३.०५.२०२५

शासन निर्णय :

विभागाच्या नियंत्रणाखालील राजर्षी छत्रपती शाहू महाराज शासकीय वैद्यकीय महाविद्यालय शेंडापार्क, कोल्हापूर येथे ६०० खाटांचे सामान्य रुग्णालय, २५० खाटांचे अतिविशेषोपचार रुग्णालय तसेच २५० खाटांच्या कर्करोग रुग्णालय इमारतींकरीता कॉंक्रीट रस्ता (टप्पा-२), विद्युतीकरण व इतर अनुषंगिक कामाच्या रुपये १०,४२,५३,२७१/- (रुपये दहा कोटी, बेचाळीस लक्ष, त्रेपन्न हजार, दोनशे एक्याहत्तर फक्त) (सर्व करांसहीत) इतक्या रक्कमेच्या अंदाजपत्रकास पुढील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| अ.क्र. | कामाचे नाव | अंदाजित किंमत (सर्व करांसहीत) |
|---|---|---|
| १ | Proposed Construction of External Road for 600 Bedded General Hospital, 250 Bedded Superspeciality Hospital & 250 Bedded Cancer Hospital at Shenda Park, Kolhapur (Phase-II) | १०,४२,५३,२७१ |
| | एकूण अंदाजित रक्कम | १०,४२,५३,२७१ |

अटी :-

१) सदर काम करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबत पुर्तता करण्यात यावी.

२) प्रस्तुत काम पुरातत्व विभागाच्या अखत्यारित येत असल्यास संबंधित विभागाची तसेच महानगरपालिका व तत्सम प्राधिकरणे यांची पूर्व परवानगी घेण्यात यावी.

३) तांत्रिक मंजूरी देताना राज्य दरसूचीबाह्य बाबींच्या दराकरीता शासन परिपत्रक क्रमांक - २०१७/प्र.क्र.११/नियोजन-३, दिनांक ११.०४.२०१७ नुसार कार्यवाही करण्यात यावी.

४) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय, इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/तां.क्र.१, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

५) स्थापत्य कामाच्या कालावधीतच विद्युतीकरणाबाबत तसेच इतर अनुषंगिक कामांचे योग्य नियोजन करुन सदर कामे पूर्ण करावीत.

६) विषयांकित कामाकरीता सुधारीत प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता लागणार नाही, यादृष्टीने विशेष दक्षता घेऊन काम करण्यात यावे.

२. प्रस्तुत बांधकामासाठी येणारा खर्च खालील लेखाशीर्षात मंजूर होणा-या निधीतून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक - एच-०८
४२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य यावरील भांडवली खर्च
०३, वैद्यकीय शिक्षण, प्रशिक्षण व संशोधन
१०५-विषमचिकित्सा पंचवार्षिक योजनांतर्गत
(४२१० ००४१) ५३- मोठी बांधकामे

३. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/ विनियम, भाग-२, दिनांक २०.०९.२०१९ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८, भाग-१, उप विभाग-५, अनुक्रमांक-१, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिकेतील परिच्छेद क्रमांक १३४ (१) नुसार प्रशासकीय विभागाला प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०५२२१८५७१९८३१३ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUDHIR JAYA SHETTY

Digitally signed by SUDHIR JAYA SHETTY
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, 2.5.4.20=72ea277025fdf5a4898b244953b82406eea05963bc456f1e1e8621e5917d8305, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E9D37D499A521B728AEB3DC8EC38B759420308B9FD7816002B4AF0FFBF1111D7, cn=SUDHIR JAYA SHETTY
Date: 2025.05.22 19:24:25 +05'30'

**(सुधीर जया शेट्टी)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. आयुक्त (वै.शि.), वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई
२. महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
३. संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई
४. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे
५. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, कोल्हापूर
६. अधिष्ठाता, राजर्षी छत्रपती शाहू महाराज शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, कोल्हापूर
७. जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर
८. निवडनस्ती (प्रशा-१).